**यशदा पुणे व राज्य प्रशिक्षण धोरणान्वये ६ विभागीय प्रशासकीय प्रशिक्षण संस्थेतील प्रतिनियुक्तीवर येणाऱ्या प्रशिक्षकांना प्रशिक्षण भत्ता मंजूर करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक-यशदा-२०१९/प्र.क्र.४९/१९/१२-अ**
हुतात्मा राजगुरू चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई-४०००३२
दिनांक:- २६ जुन, २०२०.

**वाचा** :- १. शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक एएससी-१८८४/९९९/सहा, दिनांक २४.५.१९८४
२. शासन निर्णय क्रमांक - यशदा११९४/प्रक्र.३/९५/१२-अ दि.२७ एप्रिल,१९९५
३. शासन निर्णय क्रमांक - टिआरएन- १०९५/प्रक्र.१८१/९५ /१२-अ दि.१८जून,१९९६
४. शासन निर्णय क्रमांक - टिआरएन- १०९६/प्रक्र.३३/९६ /१२-अ दि.०७,डिसेंबर,१९९६
५. शासन निर्णय क्रमांक - टिआरएन- २००९/प्रक्र.३९/०९/१२-अ दि.२३ सप्टेबर, २०११
६. शासन निर्णय क्रमांक - टिआरएन- २०११/प्रक्र.२८७/११/१२-अ दि.१४ ऑक्टोबर, २०१३
७. शासन निर्णय क्रमांक - यशदा- २०१४/४४१/प्रक्र.९३/१४/१२-अ दि.११ मे, २०१५
८. केंद्र शासनाच्या कर्मिक व प्रशिक्षण विभागाकडील कार्यालय ज्ञापन क्र.१३०२४/०१/२०१६/ टीआरजी, दिनांक २४.१०.२०१७
९. महासचालक, यशदा पुणे यांचे क्रमाक राप्रनिमूयं /विप्रप्रकुंप्र/प्रक्र.२६/२०१५-१६ दि.३०.११.२०१९.

**प्रस्तावना:-**

जबाबदार व लोकाभिमुख प्रशासन निर्माण करण्यासाठी तसेच कार्य क्षमता वाढविण्याच्या दृष्टीने राज्याच्या वर्ग-१ अधिकाऱ्यांना विकासात्मक प्रशिक्षण देणे व राज्य ग्रामीण विकास संस्था म्हणून कार्य करणे आहे. या करिता संदर्भाधीन क्र. १, ३ व ४ अन्वये सामान्य प्रशासन विभागाअंतर्गत यशवंतराव चव्हाण विकास प्रशासन प्रबोधिनी, पुणे , मराठवाडा प्रशासकीय व विकास प्रशिक्षण प्रबोधिनी, पैठण, जि.औरंगाबाद व डॉ. पंजाबराव देशमुख विदर्भ प्रशासकीय व विकास प्रशिक्षण प्रबोधिनी, अमरावती या तीन संस्थांची स्थापना करण्यात आली. या संस्थेमध्ये प्रतिनियुक्तीवर येणाऱ्या प्रशिक्षकांना संदर्भाधीन क्र. २ च्या शासन निर्णयान्वये प्रशिक्षण भत्ता मंजूर करण्यात आला होता.

२. राज्य शासन सेवेत सर्व स्तरावर कार्यक्षमता वाढवून गतिमान प्रशासन होण्याकरिता राज्यातील सर्व संवर्ग अधिकारी/कर्मचारी यांना प्रशिक्षण देण्याच्या हेतूने संदर्भाधीन क्र.५ येथील शासन निर्णयान्वये महाराष्ट्र राज्याचे प्रशिक्षण धोरण निश्चित करण्यात आले आहे. याकरीता यशदा, पुणे ही शिखर प्रशिक्षण संस्था म्हणून कार्यरत आहे. तसेच संदर्भाधीन क्र.६ येथील शासन निर्णयान्वये सेवांतर्गत व प्रशासकीय प्रशिक्षणासाठी विभागीय मुख्यालयाच्या स्तरावर ६ विभागीय संस्था स्थापन करण्यात आल्या आहेत. या संस्थाकरिता संदर्भाधीन क्र.७ शासन निर्णयान्वये २० पदांचा एकसमान आकृतिबंध मंजूर करण्यात आला आहे.

३. राज्य प्रशिक्षण धोरणाच्या दि.२३.९.२०११ च्या शासन निर्णयामधील मुद्दा क्र.५.२ नुसार **"प्रशिक्षण संस्थांकडे प्रतिनियुक्तीवर येणाऱ्या प्रशिक्षकांसाठी मूळ वेतनाच्या ३० टक्के प्रशिक्षण भत्ता अनुज्ञेय राहील. "** अशी तरतूद करण्यात आलेली आहे. या तरतुदीनुसार सामान्य प्रशासन विभागांतर्गत प्रतिनियुक्तीने भरण्यात प्रशिक्षक म्हणून जबाबदारी असलेल्या अधिकाऱ्यांना सहाव्या **वेतन आयोगानुसार मूळ वेतनाच्या ३०% प्रशिक्षण भत्ता वितरित करण्यात येत होता**.

४. आता, केंद्र शासनाच्या कार्मिक विभागाने केंद्र शासकीय कर्मचाऱ्यांना सातवा वेतन आयोग लागू झाल्यानंतर सुधारित दराने प्रशिक्षण भत्ता लागू केलेला आहे.

त्यानुसार, सामान्य प्रशासन विभागांतर्गत प्रशासकीय प्रशिक्षण संस्थांमध्ये प्रशिक्षक म्हणून प्रतिनियुक्तीवर येणाऱ्या अधिका-यांना प्रशिक्षण भत्ता मंजूर करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

सामान्य प्रशासन विभागांतर्गत राज्य प्रशिक्षण धोरणान्वये घोषित केलेल्या यशदासह ६ विभागीय प्रशासकीय प्रशिक्षण संस्थांमध्ये प्रतिनियुक्तीने कार्यरत प्रशिक्षक अधिका-यांसाठी खालील दराने प्रशिक्षण भत्ता दिनांक १ जानेवारी, २०१९ पासून मंजूर करण्यात येत आहे.

१. **यशवंतराव चव्हाण विकास प्रशासन प्रबोधिनी, पुणे या संस्थेतील प्रतिनियुक्तीने कार्यरत प्रशिक्षकांना मुळ वेतनाच्या २४ % दराने.**

**२. ६ विभागीय प्रशासकीय प्रशिक्षण संस्थांमध्ये प्रतिनियुक्तीने प्रशिक्षक म्हणून कार्यरत प्रशिक्षकांना मूळ वेतनाच्या १२ % दराने.**

**सदर प्रशिक्षण भत्ता खालील अटींच्या अधीन राहून मंजूर करण्यात येत आहे.**

**१. प्रशिक्षण भत्यावर कोणताही पूरक भत्ता अनुज्ञेय असणार नाही.**

**२. संस्थेमध्ये प्रतिनियुक्तीवर असलेल्या आणि प्रशिक्षकांचे काम करणा-या अधिकाऱ्यांना केवळ प्रशिक्षण भत्ता अनूज्ञेय असेल. सदर भत्ता घेणा-या प्रशिक्षकांना इतर भत्ते जसे प्रतिनियुक्ती भत्ता, प्रोत्साहन भत्ता अथवा विशेष वेतन अनुज्ञेय असणार नाही.**

**३. प्रशिक्षण भत्ता रजा वेतनासाठी गणण्यात येणार नाही.**

**४. संस्थेच्या खुद्द आस्थापनेवरील अथवा सेवानिवृत्तीनंतर पुर्ननियुक्तीवर असलेल्या प्रशिक्षण देणा-या अधिकाऱ्यांना प्रशिक्षण भत्ता अनुज्ञेय नसावा.**

**५. प्रतिनियुक्तीवरील प्रशिक्षण भत्ता घेणा-या प्रशिक्षक अधिका-यांना प्रशिक्षण संस्थेत तासिका घेतल्याबद्दल तासिकांचे मानधनही अनुज्ञेय रहाणार नाही.**

२. हा शासन निर्णय वित्त विभागाच्या सहमतीने त्या विभागाच्या अनौचारिक संदर्भ क्र.०१/२०२०/सेवा-६, दिनांक १.०१.२०२० नुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०२००६३०१२४७२८७१०७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Leena Ashish Sankhe

Digitally signed by Leena Ashish Sankhe
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=General Administration Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=522242e2259dbf8fc1aed336674ebf6138607b16aacbbed00301a9e43c62f6c7, serialNumber=783ca3332598c7e1c28393ea543fa05d9fb77f36a848f4738d12288e105699f4, cn=Leena Ashish Sankhe
Date: 2020.06.30 14:37:49 +05'30'

**( लिना संखे )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन.**

**प्रति,**

१. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/ लेखा परीक्षा), महाराष्ट्र-१/२ मुंबई/ नागपूर,
२. अपर मुख्य सचिव , वित्त विभाग,मंत्रालय, मुंबई -३२
३. प्रधान सचिव , वित्त विभाग,मंत्रालय, मुंबई -३२
४. सचिव (ले.व को.), वित्त विभाग,मंत्रालय, मुंबई -३२
५. महासंचालक, यशदा, राजभवन आवार, बाणेर रोड, पुणे,
६. विभागीय आयुक्त, पुणे, नाशिक, औरंगाबाद, अमरावती, नागपूर.
७. उपमहासंचालक, सीपीटीपी, यशदा, राजभवन आवार, बाणेर रोड, पुणे,
८. उपसचिव, वित्त विभाग ( सेवा ६), मंत्रालय, मुंबई -३२,
९. संचालक, विभागीय प्रशासकीय प्रशिक्षण संस्था, नाशिक
१०. संचालक, वसंतराव नाईक राज्य कृषि विस्तार व्यवस्थापन संस्था, ( वनामती ) नागपूर,
११. संचालक, मराठवाडा प्रशासकीय व विकास प्रशिक्षण प्रबोधिनी, पैठण, जि.औरंगाबाद
१२. संचालक, डॉ. पंजाबराव देशमुख विदर्भ प्रशासकीय व विकास प्रशिक्षण प्रबोधिनी, अमरावती
१३. संचालक, कुडल विकास व व्यवस्थापन प्रबोधिनी, ( वने ) कुंडल ता. पलुस जि. सांगली.
१४. जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे, नाशिक, औरंगाबाद, अमरावती, नागपूर, सांगली.
१५. अवर सचिव, सामान्य प्रशासन विभाग, कार्यासन- सीपीटीपी-अ / सीपीटीपी-ब, मंत्रालय, मुंबई -३२,
१४. अपर मुख्य सचिव ( सेवा ) यांचे वरिष्ठ स्वीय सहायक, सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई -३२,
१५. निवड नस्ती कार्यासन - १२-अ.